**"महाराष्ट्र राज्य औद्योगिक समूह विकास कार्यक्रम (MSICDP)" अंतर्गत गारमेंट क्लस्टर, चिखली जि. बुलढाणा या उद्योग समूह प्रकल्पाच्या सामायिक सुविधा केंद्र उभारणीसाठी राज्य शासनाचे प्रथम टप्प्यातील उर्वरीत अनुदानाच्या खर्चास मंजूरी देण्याबाबत.**

# महाराष्ट्र शासन

**उद्योग, ऊर्जा, कामगार व खनिकर्म विभाग**

**शासन निर्णय क्र. क्लस्टर-२०२४/ प्र.क्र.११७/ उद्योग-७**

मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.

दिनांक १०/०३/२०२५

**वाचा:-**
१) उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, शासन निर्णय क्र. एसएमई-२०१३/ प्र.क्र.२०७/ उद्योग-७, दिनांक २५/०२/२०१४.
२) उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, शासन निर्णय क्र. एमएसई-२०१९/ प्र.क्र.९३/उद्योग-७, दिनांक २४/०७/२०१९.
३) उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, शासन निर्णय क्र. एमएसई-२०२१/ प्र.क्र.१८६/उद्योग-७, दिनांक ०२/०८/२०२१.
४) उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, शासन निर्णय क्र. क्लस्टर-२०२२/ प्र.क्र.५४/उद्योग-७, दिनांक ३०/०३/२०२२.
५) राज्यस्तरीय सुकाणू समितीच्या दिनांक १४/०७/२०२३ रोजी संपन्न १६ व्या बैठकीचे इतिवृत्त.
६) उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, शासन निर्णय क्र. आयएलई-२०२३/ प्र.क्र.१४२/प्रशासन-३, दिनांक २४/०७/२०२३.
७) उद्योग संचालनालयाचे अंतिम मंजूरी आदेश क्र. DI/Cluster/CFC/FA/Garment Cluster/ Chikhali/Buldhana/2024/C-1282, दिनांक ०६/०२/२०२४.
८) अधिक्षकीय उद्योग अधिकारी (औसशा), उद्योग संचालनालय, मुंबई यांचे पत्र क्र. उसं/ औसशा/ एमएसआयसीडीपी/ CFC /अनुदान वितरण/२०२४/अे-९६९, दिनांक २२/११/२०२४.
९) उद्योग, ऊर्जा, कामगार व खनिकर्म विभाग, शासन निर्णय क्र. क्लस्टर-२०२४/ प्र.क्र.११७/उद्योग-७, दिनांक २०/०१/२०२५.

**प्रस्तावना:-**

राज्यातील औद्योगिकदृष्ट्या अविकसित क्षेत्रातील छोट्या समूहांचा समूह विकास होऊन त्याद्वारे सूक्ष्म व लघु घटकांच्या सर्वांगीण विकासास चालना मिळणेसाठी "महाराष्ट्र राज्य औद्योगिक समूह विकास कार्यक्रम (MSICDP)" ही योजना दिनांक २५/०२/२०१४ रोजीच्या शासन निर्णयान्वये जाहीर करण्यात आलेली आहे. सदर योजनेंतर्गत सूक्ष्म व लघु उपक्रमाच्या सर्वांगिण विकास व वाढीकरीता क्षमतावृध्दी कार्यक्रम अंमलबजावणीसाठी तसेच सामायिक सुविधा उभारणीसाठी राज्य शासनाचे अनुदान देण्यात येते.

**२.** उद्योग संचालनालयाच्या दिनांक २२/११/२०२४ रोजीच्या प्रस्तावामध्ये नमूद केल्यानुसार, गारमेंट क्लस्टर, चिखली जि. बुलढाणा या औद्योगिक समूह प्रकल्पास सामायिक सुविधा केंद्र उभारणीसाठी रुपये ८,५३,८९,०००/- एवढ्या प्रकल्प किमतीस प्रधान सचिव(उद्योग) यांच्या अध्यक्षतेखालील राज्यस्तरीय सुकाणू समितीने दिनांक १४/०७/२०२३ रोजीच्या बैठकीमध्ये अंतिम मंजूरी दिली आहे. त्याकरीता राज्य शासनाचे सहभाग अनुदान रुपये ७,६८,५०,०००/- (९०%) इतके असून मे. श्यामकुटीर गारमेंट असोसिएशन, चिखली जि. बुलढाणा या विशेष हेतू वाहन संस्थेची सहभाग वर्गणी रुपये ८५,३९,०००/- इतकी आहे. सदर औद्योगिक समूह प्रकल्पामध्ये १००% सदस्य महिला उद्योजक असल्याने या प्रकल्पाची विशेष हेतू वाहन संस्था मे. श्यामकुटीर गारमेंट असोसिएशन, चिखली जि.

बुलढाणा, दिनांक ०२/०८/२०२१ रोजीच्या शासन निर्णयान्वये, प्रकल्प किमतीच्या ९०% पर्यंत राज्य शासनाचे अनुदान मिळण्याकरीता पात्र आहे. त्याअनुषंगाने उद्योग संचालनालयाकडून दिनांक ०६/०२/२०२४ रोजी अंतिम मंजूरी आदेश निर्गमित करण्यात आले आहेत.

**३.** MSICDP योजनेच्या तरतूदीनुसार विभागीय समिती मार्फत खरेदी प्रक्रिया पूर्ण झाल्याचा खरेदी तपशिलासहचा अहवाल उद्योग सह संचालक, अमरावती यांनी उद्योग संचालनालयामार्फत सादर केला आहे. सदर प्रकल्पाच्या सामायिक सुविधा केंद्र उभारणीसाठी राज्य शासनाच्या हिश्श्यातील प्रथम टप्प्यातील २०% अनुदान रुपये १,५३,७०,०००/- वितरीत करण्याबाबत उद्योग संचालनालयाकडून दिनांक २२/११/२०२४ रोजीच्या पत्रान्वये विनंती करण्यात आली आहे. त्यानुसार वित्त विभागाकडून वितरणाकरीता उपलब्ध करून दिलेल्या निधीच्या मर्यादेत, राज्य शासनाच्या सहभाग अनुदानापैकी प्रथम टप्प्यातील २०% अनुदान रुपये १,५३,७०,०००/- पैकी रुपये १,३२,२६,६०९/- इतका निधी वितरीत करण्यास दिनांक २०/०१/२०२५ रोजीच्या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आली आहे.

**४.** सन २०२४-२५ या आर्थिक वर्षाकरीता MSICDP योजनेअंतर्गत गारमेंट क्लस्टर, चिखली जि. बुलढाणा या औद्योगिक समूह प्रकल्पाकरीता राज्य शासनाचे प्रथम टप्प्यातील अनुदान रुपये १,५३,७०,०००/- पैकी उर्वरीत रुपये २१,४३,३९१/- इतक्या अनुदानाच्या खर्चास मंजूरी देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**<u>शासन निर्णय</u>:-**

राज्य शासनाच्या "महाराष्ट्र राज्य औद्योगिक समूह विकास कार्यक्रम (MSICDP)" या योजनेंतर्गत मंजूरीप्राप्त गारमेंट क्लस्टर, चिखली जि. बुलढाणा या प्रकल्पाच्या सामायिक सुविधा केंद्र उभारणीसाठी, प्रकल्प मंजूरीप्रमाणे तसेच MSICDP योजनेच्या तरतूदीनुसार, राज्य शासनाच्या हिश्श्यातील प्रथम टप्प्यातील २०% अनुदान रुपये १,५३,७०,०००/- पैकी उर्वरीत रुपये २१,४३,३९१/- (रुपये एकवीस लक्ष त्रेचाळीस हजार तीनशे एक्याण्णव फक्त) इतक्या अनुदानाच्या खर्चास या शासन निर्णयान्वये मंजूरी देण्यात येत आहे.

**२.** सदर रुपये २१,४३,३९१/- इतकी अनुदानाची रक्कम गारमेंट क्लस्टर, चिखली जि. बुलढाणा या समूह प्रकल्पाच्या मे. श्यामकुटीर गारमेंट असोसिएशन, चिखली जि. बुलढाणा या विशेष हेतू वाहन संस्थेला अदा करण्यासाठी आहरण व संवितरणाची जबाबदारी ही विकास आयुक्त (उद्योग), उद्योग संचालनालय, मुंबई यांच्या कार्यालयातील लेखा अधिकारी यांची राहील.

**३.** वित्त विभागाचे शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०२४/प्र.क्र.८०/अर्थ-३, दिनांक २५/०७/२०२४ व त्यासोबतचे परिशिष्ठामध्ये नमूद तरतूदी तसेच त्याअनुषंगाने उद्योग संचालनालयाकडून प्राप्त माहितीनुसार असे प्रमाणित करण्यात येते की,

i. "महाराष्ट्र राज्य औद्योगिक समूह विकास कार्यक्रम" ही योजना दिनांक दिनांक २५/०२/२०१४ रोजीच्या शासन निर्णयान्वये राज्यामध्ये राबविण्यात येत आहे. योजनेचा उद्देश, कालावधी, अंमलबजावणी यंत्रणा, प्रकल्प मंजूरी प्रक्रिया, त्याअनुषंगाने विविध मंजूरीस्तव समिती, अंमलबजावणी कार्यपध्दती, अनुदान वितरण इत्यादीची माहिती दिलेली आहे. तसेच दिनांक २४/०७/२०१९ रोजीच्या शासन निर्णयान्वये सदर योजनेची व्याप्ती वाढविण्यात आली आहे.

ii. गारमेंट क्लस्टर, चिखली जि. बुलढाणा या औद्योगिक समूह प्रकल्पास प्रधान सचिव (उद्योग) यांच्या अध्यक्षतेखालील दिनांक १४/०७/२०२३ रोजीच्या राज्यस्तरीय सुकाणू समितीच्या १६ व्या बैठकीत सामायिक सुविधा केंद्र उभारणीसाठी अंतिम मंजूरी देण्यात आलेली आहे. दिनांक ०२/०८/२०२१ रोजीच्या शासन

निर्णयान्वये, सदर औद्योगिक समूह प्रकल्पामध्ये १००% सदस्य महिला उद्योजक असल्याने प्रकल्प किमतीच्या ९०% पर्यंत राज्य शासनाचे अनुदान मिळण्याकरीता सदर प्रकल्प संस्था पात्र आहे. त्याअनुषंगाने उद्योग संचालनालयाकडून दिनांक ०६/०२/२०२४ रोजी अंतिम मंजूरी आदेश निर्गमित करण्यात आले आहेत.

iii. सदर योजनेंतर्गत यापूर्वी वितरीत ७५% पेक्षा जास्त अनुदानाचे उपयोगिता प्रमाणपत्र उद्योग संचालनालयाकडून सादर करण्यात आले आहेत.

iv. सदर प्रकल्पास यापूर्वी वितरीत करण्यात आलेल्या अनुदानाबाबत लेखा परिक्षकांकडून कोणतेही आक्षेप उपस्थित करण्यात आलेले नाहीत.

v. निधी मंजूरीप्राप्त प्रकल्पाच्या प्राधिकृत बँक खात्यामध्ये थेट जमा होणार आहे.

**४.** सदर समूह प्रकल्पाच्या प्रगतीवर व दिलेल्या शासकीय अनुदानाच्या सुयोग्य विनियोगावर देखरेख ठेवण्याची जबाबदारी ही विकास आयुक्त (उद्योग), उद्योग संचालनालय, मुंबई यांची राहील.

**५.** सदर प्रयोजनार्थ होणारा खर्च "मागणी क्रमांक के-७, २८५१-ग्रामोद्योग व लघु उद्योग, ००, १०२-लघुउद्योग, (००) (२४) महाराष्ट्र राज्य औद्योगिक समूह विकास कार्यक्रम (कार्यक्रम) (२८५१ ६३७८), ३३-अर्थसहाय्य" या लेखाशिर्षाखालील सन २०२४-२५ या आर्थिक वर्षात मंजूर केलेल्या अर्थसंकल्पीय तरतुदीतून भागविण्यात येईल. तसेच सदर प्रयोजनार्थ होणारा प्रत्यक्ष खर्च निधी वितरणाच्या अधीन राहून करण्याची दक्षता घेण्यात येईल.

**६.** सदर शासन निर्णय, वित्त विभागाचे शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०२४/प्र.क्र.८०/अर्थ-३, दिनांक २५/०७/२०२४ व दिनांक १२/०२/२०२५ मधील सूचनांची व त्यासोबतच्या परिशिष्टात नमूद तपासणी सूचीप्रमाणे सर्व बाबींची पूर्तता होत असल्याने तसेच नियोजन विभागाच्या अनौ. संदर्भ क्र.३३/का.१४६१, दिनांक ११/०२/२०२५ आणि वित्त विभागाच्या अनौ. संदर्भ क्र. ५३/२०२५/व्यय-१६, दिनांक १३/०२/२०२५ अन्वये प्राप्त सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

**७.** सदर शासन निर्णय प्रशासकीय विभाग प्रमुख म्हणून सचिव (उद्योग) यांना दिनांक २४/०७/२०२३ रोजीच्या शासन निर्णयान्वये प्रदान करण्यात आलेल्या वित्तीय अधिकारांतर्गत निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२५०३१०१६२३४७२०१० असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Digitally signed by AJIT TUKARAM SASULKAR
Date: 2025.03.10 16:25:47 +05'30'

**(अजित सासुलकर)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) विकास आयुक्त (उद्योग), उद्योग संचालनालय, मुंबई-३२. (पाच प्रती)

२) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरिक्षा), महाराष्ट्र-१/२, मुंबई/ नागपूर.

३) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.

४) निवासी लेखापरिक्षा अधिकारी, मुंबई.

५) संचालक, लेखा व कोषागारे, संगणक कक्ष, नवीन प्रशासन भवन, ५ वा मजला, मुंबई.

६) उद्योग सह संचालक, विभागीय कार्यालय, अमरावती. (उद्योग संचालनालयामार्फत)

७) महाव्यवस्थापक, जिल्हा उद्योग केंद्र, बुलढाणा. (उद्योग संचालनालयामार्फत)

८) मे. श्यामकुटीर गारमेंट असोसिएशन, चिखली जि. बुलढाणा. (उद्योग संचालनालयामार्फत)

९) नियोजन विभाग (कार्यासन १४६१), मंत्रालय, मुंबई-३२.

१०) वित्त विभाग (कार्यासन व्यय-१६), मंत्रालय, मुंबई-३२.

११) कक्ष अधिकारी (कार्यासन प्रशासन-१), उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.

१२) निवडनस्ती (उद्योग-७).